राज्यातील विविध नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये दि.११.०३.१९९३ - दि.२७.०३.२००० या कालावधीत नियुक्ती होऊन कार्यरत असलेल्या रोजंदारी कर्मचाऱ्यांचे समावेशन व अधिसंख्य अस्थायी पदनिर्मितीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.१२२/नवि-१४,**
मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक ०५ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ** :- १. नगर विकास विभागाचे पत्र क्र.नपाप्र-१०९९/९९/१५९/९८/नवि-१६, दि.०६.०५.२०००.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण १०९९/२९४/प्र.क्र.७८/२०००/नवि-२७, दि.२८.०९.२०००.
३. नगरपरिषद प्रशा संचालनालयाचे आदेश क्र.नप्रसंई १०२०/प्र.क्र.१३६/२००१/७, दि.२०.४.२००१.
४.नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचा दि.०५.०५.२०१८ चा प्रस्ताव.

**प्रस्तावना: -**

राज्यातील नगरपरिषदांमध्ये कार्यरत असलेल्या दि.१०.०३.१९९३ पूर्वीच्या रोजंदारी कर्मचाऱ्यांना नियमित सेवेत सामावून घेण्याचा धोरणात्मक निर्णय संदर्भ क्र.१ अन्वये घेण्यात आला आहे. तसेच, नगरपरिषद प्रशासन संचालनालयाच्या संदर्भ क्र.३ येथील आदेशान्वये दि.१०.०३.१९९३ पूर्वीपासून रोजंदारीवर कार्यरत असलेल्या, कर्मचाऱ्यांना सेवेत नियमित करण्याकरीता कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यात आली आहेत.

राज्यातील विविध नगरपरिषदा/ नगरपंचायतींच्या आस्थापनेवर दि.११.०३.१९९३ - दि.२७.०३.२००० या कालावधीत रोजंदारी तत्वावर नियुक्त होऊन कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना त्यांच्या दिर्घ सेवा विचारात घेवून, नियमित करण्याची मागणी नगरपरिषद कर्मचारी संघटना व लोकप्रतिनिधींनी शासनाकडे केली होती. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ७६ नुसार नगरपरिषद आस्थापनेवर पद निर्मितीचे अधिकार संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहेत. त्यानुसार, दि.११.०३.१९९३- दि.२७.०३.२००० या कालावधीतील नियुक्त होऊन कार्यरत असणाऱ्या रोजंदारी कर्मचाऱ्यांना नियमित सेवेत सामावून घेण्याचा अनुषंगाने, संदर्भ क्र.४ अन्वये आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी शासनाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला होता. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, उपरोक्त कालावधीत नगरपरिषद / नगरपंचायतींमध्ये नियुक्त झालेल्या व कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांचे समावेशन व आवश्यक अस्थायी अधिसंख्य पदनिर्मिताची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रस्तावासंदर्भात मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेनुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय: -

दि.११.०३.१९९३ ते दि.२७.०३.२००० या कालावधीतील विविध नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये रोजंदारी तत्वावर नियुक्ती होऊन कार्यरत असलेल्या १४१६ कर्मचाऱ्यांचे या शासन निर्णयाच्या दिनांकापासून परिशिष्ट--अ॰ व -ब॰ मधील तपशिलानुसार समावेशन करण्यास व त्यासाठी अस्थायी अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन तसेच, अस्थायी अधिसंख्य पदांची निर्मिती खाली नमुद करण्यात आलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून तसेच, खाली विहीत करण्यात आलेल्या पध्दतीने करण्यात यावे: -

१) १४१६ कर्मचाऱ्यांपैकी वर्ग-३ चे २६८ कर्मचारी व वर्ग-४ चे ५३८ कर्मचाऱ्यांच्या समावेशनासाठी विविध नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये ८०६ मंजूर पदे उपलब्ध आहेत. **या मंजूर उपलब्ध पदांवर सोबतच्या परिशिष्ट-'अ' व 'ब' मधील तपशिलानुसार संबंधित कर्मचाऱ्यांमधील ८०६ कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

२) उर्वरित कर्मचाऱ्यांसाठी **वर्ग-३ ची ६ पदे व वर्ग-४ ची ६०४ पदे अशी एकुण ६१० पदे संबंधित नगरपरिषद/ नगरपंचायतींच्या आस्थापनेवर निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी येणारे वार्षिक वित्तीय दायित्व नगरपरिषदा/ नगरपंचायतींना देण्यात येणाऱ्या सहायक अनुदान व नगरपरिषद निधीमधून भागविण्यात यावे.**

३) सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन चारित्र्य पडताळणीच्या अधिन तसेच, ज्या पदावर समावेशन होणार आहे त्यासाठी किमान शैक्षणिक पात्रता विहीत करण्यात आली असल्यास, ती धारण करीत असणे आवश्यक असेल या अटींच्या अधीन राहून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) ज्या कर्मचाऱ्यांच्या समावेशनासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येणार आहेत, त्या कर्मचाऱ्यांचे प्रथमत: या अधिसंख्य अस्थायी पदांवर समावेशन करण्यात यावे.

५) नियमित पदावरील कर्मचाऱ्यांची सेवानिवृत्ती / पदोन्नती वा अन्य कारणास्तव पद रिक्त झाल्यावर अधिसंख्य पदावरील कर्मचाऱ्यास अशा रिक्त पदावर दर्शाविण्यात यावे व संबंधित कर्मचाऱ्याने धारण केलेले अधिसंख्य पद व्यपगत करण्यात यावे.

६) समावेशन झालेल्या सर्व कर्मचाऱ्यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी. समावेशनाचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी संबंधित कर्मचाऱ्यांकडून तसे बंधपत्र घेण्यात यावे.

७) नियमित सेवेच्या दिनांकापासून त्यांना सेवाज्येष्ठता निवृत्तीवेतन इ. चे लाभ अनुज्ञेय राहतील.

८) समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवाकालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

९) तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे नवनिर्मित नगरपरिषदेत / नगरपंचायतींमध्ये समावेशन करताना ज्या धर्तीवर तांत्रिक अर्हतेत शिथिलता देण्यात आली होती त्यानुसार या प्रकरणी कार्यवाही करण्यात यावी.

१०) दि.१०.०३.१९९३ पूर्वीच्या कर्मचाऱ्यांचे समावेशन करताना संचालनालयाने विहीत केलेली मार्गदर्शक तत्वे व अन्य अटी या प्रकरणीही लागू राहतील.

११) सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन करताना ज्याप्रमाणे विहित तांत्रिक अर्हता विशिष्ट मुदतीत पूर्ण करण्याची अट, इत्यादी सेवाविषयक अटी शिथिल करण्यात आल्या होत्या त्याचप्रमाणे या कर्मचाऱ्यांबाबतही अटी शिथिल करण्यात मान्यता देण्यात येत आहे.

२. कनिष्ठ अभियंता पदांचा (वर्ग-३) राज्य संवर्गात यापूर्वीच समावेश झाला आहे. तसेच, सदर संवर्गाची पदसंख्या देखील यापूर्वीच अधिसूचीत झाली आहेत. आरोग्य निरिक्षक या पदाचा देखील राज्य संवर्गात समावेश व पदसंख्या निश्चिती प्रस्तावित करण्यात आलेली आहे. त्यामुळे, उपरोक्त कर्मचाऱ्यांमधील कनिष्ठ अभियंता ९ पदे व आरोग्य निरिक्षक ३ पदांवर कार्यरत रोजंदारी कर्मचाऱ्यांना उपलब्ध लिपिक पदावर समावेशनाचा पर्याय देण्यास व लिपिक पदावर समावेशनाचा पर्याय संबंधित कर्मचाऱ्यांनी स्विकारल्यास सदर समावेशनास मान्यता देण्यात येत आहे.

३. संबंधित रोजंदारी कमर्चाऱ्यांचे समावेशन करण्याच्या दृष्टीने, एकवेळची विशेष बाब म्हणून केवळ या प्रकरणी नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०९९/२९४/प्र.क्र.७८/२०००/नवि २७, दि.२८.०९.२००० अन्वये निश्चित करण्यात आलेल्या आस्थापना खर्चाच्या विहीत मर्यादेतून सूट देण्यात येत आहे.

४. संबंधित कर्मचाऱ्यांचे समावेशन करताना, त्यांच्या सेवा नियुक्तीच्या दिनांकापासून सलग असल्याची तसेच, वैद्यकीय मंडळाचे विहीत प्रमाणपत्र प्राप्त करण्यात आले आहे याची खातरजमा करण्यात यावी.

५. संबंधित रोजंदारी कर्मचाऱ्यांमधील पात्र रोजंदारी कर्मचाऱ्यांना सामावून घेताना सेवाजेष्ठतेनुसार नियमित सेवेत सामावून घेण्यात यावे.

६. संबंधित रोजंदारी कर्मचाऱ्यांचे समावेशन शासन धोरणानुसार व आदेशानुसार करण्यात येत असल्याने, संबंधित स्थानिक प्राधिकरणांच्या (नगरपरिषदा/ नगरपंचायतींच्या) मान्यतेची आवश्यकता नाही.

७. समावेशन अपेक्षित असणाऱ्या कर्मचाऱ्यांची संख्या व माहिती ही संबंधित मुख्याधिकाऱ्यांनी व प्रादेशिक उप संचालक यांनी प्रमाणित करुन, नगरपरिषद प्रशासन संचालनालयास सादर केली आहे. तद्नुसार, प्रमाणित याद्यांप्रमाणे समावेशनाची कार्यवाही संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत करण्यात यावी. तसेच, प्रत्यक्ष कर्मचारी व प्रमाणित यादी यामध्ये विसंगती आढळल्यास अशी विवक्षित प्रकरणे आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्याकडे मार्गदर्शनास्तव पाठवून त्यानुसार, पुढील कार्यवाही करावी.

८. सदर प्रक्रिया पूर्ण करण्यासाठी संबंधित विभागीय आयुक्त यांना प्राधिकृत करण्यास व सदर कर्मचाऱ्यांना इतर नगरपरिषदातील स्थायी रिक्त पदांवर नेमणूका देण्यासाठी अधिनियमातील कलम ७६(३) नुसार संबंधित जिल्ह्याच्या जिल्हाधिकाऱ्यांना निवड प्राधिकारी म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

९. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सदर संपूर्ण प्रक्रिया विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक यांचेमार्फत पूर्ण करून त्याबाबतचा एकत्रित अहवाल शासनास सादर करावा.

१०. दि.१०.०३.१९९३ पूर्वीच्या कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबत सन २००० मध्ये निर्णय घेण्यात आला होता. तथापि, विवक्षित अटी समाविष्ट न केल्याने, समावेशनातील अडचणी, उद्भवणारी न्यायालयीन प्रकरणे विचारात घेता, शासन धोरणात एकसूत्रता व एकवाक्यता राहण्याच्या दृष्टीने, दि.१०.०३.१९९३ पूर्वीच्या उर्वरित कर्मचाऱ्यांची प्रकरणे देखील यापुढे उपरोक्त अटी व शर्ती नुसार विनियमित करण्यात यावीत.

११. सदर शासन निर्णयातील तरतूदी केवळ राज्यातील नगरपरिषदा/ नगरपंचायतींसाठी लागू राहतील.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०५१७१६४१५३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay S Gokhale

Digitally signed by Sanjay S Gokhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b662808245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay S Gokhale
Date: 2019.02.05 17:19:01 +05'30'

**(सं.श.गोखले)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री(वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग/ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग/ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक (सर्व)
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०.सह / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (नवि-१४)

**( शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.१२२/नवि-१४, दि.०५.०२.२०१९ चे परिशिष्ट-अ )**

समावेशन प्रस्तावित असणाऱ्या **वर्ग-३** कर्मचाऱ्यांची संख्या**,** वेतनश्रेणी व उपलब्ध पदे व निर्माण करावी लागणारी पदे यांचा पदनिहाय तपशिल खालीलप्रमाणे:-

| **अ.क्र.** | **पदनाम व वेतनश्रेणी** | **रोजंदारी कर्मचारी संख्या** | **राज्यभरातील रिक्त पदांवर सामावून घेता येईल ती संख्या** | **निर्माण करावी लागणारी अधिसंख्य अस्थायी पदसंख्या** |
|---|---|---|---|---|
| १. | लिपिक ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) | २२१ | २३३ | ०० |
| २. | वाहनचालक ५२००-२०२०० (ग्रेड पे-१९००) | २४ | २४ | ०० |
| ३. | कनिष्ठ अभियंता / शहर अभियंता ९३००-३४८०० (ग्रेड पे ४२००) | ०९ | राज्य संवर्गातील पद असल्याने, लिपिक पदावर समावेशनाचा पर्याय देणे. | |
| ४. | आरोग्य निरिक्षक / स्वच्छता निरीक्षक ५२००-२०२०० (ग्रेड पे २४००) | ०३ | | |
| ५. | तारतंत्री/ वायरमन ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०२ | ०२ | ०० |
| ८. | एक्स-रे टेक्निशियन ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०१ | ०० | ०१ |
| ९. | जोडारी/ पंप ऑपरेटर/ वीजतंत्री/ फिटर ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०७ | ०७ | ०० |
| १०. | मिस्त्री ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०१ | ०० | ०१ |
| ११. | प्लंबर ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०१ | ०० | ०१ |
| १२. | ग्रंथपाल ५२००-२०२०० (ग्रेड पे २४००) | ०१ | ०१ | ०० |
| १३. | अग्निशमन वाहनचालक | ०१ | ०० | ०१ |
| १४. | ओव्हरसिअर ५२००-२०२०० (ग्रेड पे २४००) | ०१ | ०० | ०१ |
| १५. | सहाय्यक ग्रंथपाल ५२००-२०२०० (ग्रेड पे २४००) | ०१ | ०१ | ०० |
| १६. | हातपंप मेकॅनिक | ०१ | ०० | ०१ |
| | **एकुण** | **२७४** | **२६८** | **६** |

**( शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.१२२/नवि-१४, दि.०४.०२.२०१९ चे परिशिष्ट-ब )**

समावेशन प्रस्तावित असणाऱ्या **वर्ग-४** कर्मचाऱ्यांची संख्या, वेतनश्रेणी व उपलब्ध पदे व निर्माण करावी लागणारी पदे यांचा पदनिहाय तपशिल खालीलप्रमाणे:-

| अ.क्र. | पदनाम व वेतनश्रेणी | रोजंदारी कर्मचारी संख्या | राज्यभरातील रिक्त पदांवर सामावून घेता येईल ती संख्या | निर्माण करावी लागणारी अधिसंख्य अस्थायी पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १. | शिपाई-४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | २८८ | १५९ | १२९ |
| २. | सफाई कामगार ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ४७८ | २८५ | १९३ |
| ३. | मजूर ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | २४६ | १८ | २२८ |
| ४. | व्हॉल्वमन ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ७५ | ५७ | १८ |
| ५. | मुकादम ४४४०-७४४० (ग्रेड पे १६००) | ०५ | ०५ | ०० |
| ६. | वॉचमन /रखवालदार ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ३८ | ०४ | ३४ |
| ७. | आया ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०१ | ०१ | ०० |
| ८. | वॉर्डबॉय ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०१ | ०१ | ०० |
| ९. | क्लिनर ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०२ | ०० | ०२ |
| १०. | माळी ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०१ | ०१ | ०० |
| ११. | फायरमन ५२००-२०२०० (ग्रेड पे १८००) | ०७ | ०७ | ०० |
| | **एकुण** | **११४२** | **५३८** | **६०४** |